आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी नियोजन व संनियंत्रण शाखा जनजाती विकास संशोधन व प्रशिक्षण संस्था या योजनेतून निधी वितरण.
(लेखाशिर्ष २२२५ २६५८)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२४/प्र.क्र.०२/२०२४
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : ०६ सप्टेंबर, २०२४.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि.१७.०४.२०१५.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४.
३) आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे पत्र क्र.आसंप्रसं/प्रशिक्षण/का.०४/२०२४/३४५, दि.०१.०८.२०२४.
४) आदिवासी विकास विभागाचे पत्र क्र.कार्यशा-२०२४/प्र.क्र.४/का-१६ दिनांक ०६.०८.२०२४.
५) आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे पत्र क्र.आसंप्रसं/२०२४/प्रशि/का.०४/९९२, दि.०४.०९.२०२४.

**प्रस्तावना :-**

आदिवासी विकास विभागामार्फत अपर आयुक्त व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांची दिनांक २२ व २३ ऑगस्ट २०२४ रोजी लोणावळा, पुणे येथे २ दिवसाची कार्यशाळा आयोजित करण्यात आली होती. या कार्यशाळेच्या आयोजनासाठी रु. २५.०० लाख इतक्या निधीची मागणी आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांनी संदर्भाधिन क्र.३ अन्वये केली होती. या खर्चासाठी संदर्भाधीन क्र.४ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर प्रस्तावास वित्त विभागाने मान्यता दिलेली आहे. संदर्भाधीन क्र.५ अन्वये आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांनी या कार्यशाळेसाठी एकूण रु. २४.५० लाख इतका खर्च आल्याचे कळविले आहे. त्या अनुषंगाने निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५, २२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण या मुख्य लेखाशिर्षांतर्गत जनजाती विकास संशोधन व प्रशिक्षण संस्था (लेखाशिर्ष २२२५ २६५८) या योजनेतून सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीत तरतुदींतून वितरीत करण्यास पुढीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.लाखात)**

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | उद्दिष्ट | सन २०२४-२५ करीता अर्थसंकल्पित तरतूद | या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| नियोजन व संनियंत्रण शाखा जनजाती विकास संशोधन व प्रशिक्षण संस्था | २२२५ २६५८ | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | ५०.०० | २४.५० |

उपरोक्तप्रमाणे **रु.२४.५० लाख (अक्षरी रुपये चोवीस लाख पन्नास हजार फक्त) इतका निधी नियंत्रक अधिकारी तथा, आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे** यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण (BEAMS) प्रणालीवर वितरीत व खर्च करण्यास मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ व २ च्या शासन परिपत्रकांतील शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.८०४/२०२४/व्यय-१४, दि.२८.०८.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८२८१७३६१९६३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2024.09.06 12:32:20 +05'30'

**( किरण कि.पवार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव, आदिवासी विकास यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
६. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७. कार्यासन क्र. १६, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
८. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.